**ई-गव्हर्नन्स प्रकल्पांतर्गत संगणक व हेव्ही ड्युटी नेटवर्क प्रिंटर विथ स्कॅनर ई-निविदा पध्दतीने खरेदी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः ई-गव्ह १५१६/प्र.क्र.५७/१६)/संगणक,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ०२ जानेवारी, २०१७

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्र.मातसं २०११/प्र.क्र.१२५/३९, दिनांक २३.०९.२०११

२) सहाय्यक संचालक, क्रीडा व युवक सेवा, म.रा., पुणे यांचे पत्र क्र.ई गव्हर्नन्स/रकाप २०१६-१७/का-२, दिनांक ०९/०९/२०१६

<u>प्रस्तावना :-</u>

संदर्भाधिन क्र.१ वरील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र शासनाने ई-प्रशासन धोरण जाहिर केले आहे. सदर धोरणाची प्रभावी अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने आर्थिक वर्ष २०१६-१७ मध्ये ई -गव्हर्नन्स प्रकल्पांतर्गत संगणक व इतर साहित्य उपलब्ध करुन देण्याची विनंती सहाय्यक संचालक, क्रीडा व युवक सेवा, म.रा., पुणे यांच्या संदर्भाधिन क्र.२ वरील पत्रान्वये करण्यात आली होती. तसेच विभागातील (खुद्द) विविध कार्यासनांकडूनही सदर साहित्य उपलब्ध करुन देण्याबाबत मागणी नोंदविण्यात आली होती. त्यानुसार संगणक व इतर साहित्याच्या खरेदीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय :-</u>

प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक १४/०९/२०१६ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयाप्रमाणे खुद्द शालेय शिक्षण विभागासाठी मंत्रालय स्तरावर २६ संगणक, व ६ Heavy Duty Network Printer with Scanner व आयुक्त, क्रीडा व युवकसेवा यांच्या अधिनस्थ कार्यालयांसाठी १२६ संगणक (आयुक्त, क्रीडा व युवकसेवा यांच्या कार्यालयासाठी २४ संगणक, प्रत्येक उपसंचालक(क्रिडा) कार्यालय- प्रत्येकी ३ याप्रमाणे २४ संगणक, प्रत्येक जिल्हा क्रीडा अधिकारी कार्यालय-प्रत्येकी २ याप्रमाणे ७२ संगणक असे एकूण १२० संगणक ) याप्रमाणे एकूण १४६ संगणक, व ६ Heavy Duty Network Printer with Scanner ई-निविदा पध्दतीने खरेदी करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर खरेदीबाबतची कार्यवाही करण्यासाठी तयार करण्यात आलेल्या सहपत्र 'अ' मधील Request For Proposal (RFP) ला प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या (PIC) च्या दिनांक ०१.१२.२०१६ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार सदर खरेदी आयुक्त (क्रीडा), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्तरावरुन ई-निविदा पध्दतीने करण्यात यावी.

२. सदरचा खर्च सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील "२२०२,सर्वसाधारण शिक्षण, (०२) संकीर्ण,(०२) (५१) ई- गव्हर्नन्स कार्यक्रम, ३१-सहायक अनुदाने(वेतनेतर) (२२०२ H४५४) (योजनांतर्गत)" या लेखाशीर्षांतर्गत मंजूर निधीतून भागविण्यात यावा. तसेच सदर लेखाशिर्षातून खर्च करण्यासाठी शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यामुळे आयुक्त (क्रीडा), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदर साहित्य खरेदीबाबतची देयके निधी उपलब्ध करुन घेण्यासाठी त्यांचेकडे सादर करावी.

३. हे आदेश वित्तिय अधिकार नियमपुस्तिका- २०१५, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग २ मधील अनुक्रमांक २७ अ वरील नियम ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०२१५४५३५१२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila D Chaudhari

Digitally signed by Charushila D Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila D Chaudhari
Date: 2017.01.02 15:51:48 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. आयुक्त ( क्रीडा व युवक सेवा ), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. संचालक, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
४. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२
७. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
८. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०. प्रधान सचिव यांचे स्वीय सहायक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय,मुंबई
११. संग्रहार्थ (संगणक कक्ष)

********